Convertion in Regular Temparary Establishment:- Shri Dhanlal Fagu Arshe & Other 2 workers under S.E.& Administrator, CADA,Nagpur

अधीक्षक अभियंता व प्रशासक, विकास प्राधिकरण, नागपूर यांच्या अधिपत्याखालील सर्वश्री धनलाल फागु आरसे व इतर २ कामगारांना रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
जलसंपदा विभाग ,
शासन निर्णय क्र. रुअआ २००७/(६१/२००७)/आ(कामगार)
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०५/०४/२०११

**पहावे** :- १)अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर यांचे पत्र जा.क्र.७०३१/लाविप्रा/ आ-१/ २००६, दि.२५.९.२००६
२)शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र.रु.अ.आ.१५९६/२२८/सेवा-५, दि.२४.४.२००१.

**प्रस्तावना:-**

सर्वश्री धनलाल फागु आरसे, हरिचंद कोदु अतकरी, भोजराज बकाराम हरीणखेडे या मजूरांना अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर अंतर्गत उपविभागात नियमित हजेरी पटावर सन १९७५ पासुन अकुशल कामगार म्हणुन पाणी वाटपाचे काम करण्याकरिता कामावर घेतले जात होते व काम संपताच त्यांना कामावरून कमी केले जात होते. त्यानुसार सन १९८२ मध्ये त्यांना काम नसल्यामुळे कामावरुन कमी केल्यानंतर त्यांनी नियमित काम मिळावे म्हणुन मा.कामगार न्यायालय,भंडारा येथे युएलपी क्र.३१/८३ व ३२/८३ दाखल केल्या. न्यायालयाने यासंदर्भात संबंधीतांना सेवासातत्य व मागील वेतनाच्या थकबाकीसह सेवेत पुन:स्थापित करण्यात यावे, असा निर्णय दिला. यानंतर सदर निर्णयाच्या अंमलबजावणीसाठी त्यांनी मा.औद्योगिक न्यायालय,नागपूर येथे अनुक्रमे दावे क्र.युएलपी २७,२८,२९/८८ असे दाखल केले. सदर दावे मा.औद्योगिक न्यायालय,भंडारा येथे अनुक्रमे क्र. १,२,३/८८ अन्वये स्थलांतरीत झाले. यासंदर्भात दि.१४.८.१९९७ रोजी Status quo दिल्यामुळे संबंधीतांना नियमित हजेरी पटावर कामावर चालू ठेवण्यात आले असून सदर तीन कामगार आजपर्यत रोजंदारी आस्थापनेवर मजुर पदावर कार्यरत आहेत. सदर दावा अंतिम निर्णयासाठी न्यायालयात प्रलंबित असताना क्षेत्रीय कार्यालयाने शासन निर्णय दि.२४.४.२००१ मधील तरतूदीनुसार संबंधीत कर्मचारी कपात केलेल्या कालावधीतील थकबाकीची रक्कम सोडुन देण्यास तयार असल्यामुळे सदरहू दावे तडजोडीने मागे घेतले. सदर दाव्याचा अंतिम निर्णय दि.२७.२.२००४ रोजी झाला. सदर निर्णयामध्ये मा.उच्च न्यायालयातील रिट पिटीशन क्र.३३९६/२००२ महाराष्ट्र शासन विरुध्द एम.व्ही.घालगे या प्रकरणामधील दि.३.६.२००३ च्या न्यायनिर्णयाच्या आधारे संबधित कामगारांच्या सलग ५ वर्षाच्या सेवेची परिगणना करुन त्यानुसार त्यांना न्या.कालेलकर करारानुसार ज्याप्रमाणे रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याचे आदेश दिलेले आहेत त्याप्रमाणे सदर प्रकरणी कार्यवाही करण्याचा निवाडा न्यायालयाने दिला. त्यामुळे प्रस्तुत प्रकरणी न्यायालयाने दिलेला निर्णय आणि न्यायालयातील दावे मागे घेण्याबाबत त्यांनी केलेली तडजोड विचारात घेऊन उपरोक्त मजूरांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा व त्यांना सेवा सातत्य देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता. यासंदर्भात पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

सर्वश्री धनलाल फागु आरसे, हरिचंद कोदु अतकरी, भोजराज बकाराम हरीणखेडे यांची प्रथम नियुक्ती सन १९८० पूर्वीची असली तरी तडजोडी अंतर्गत मा. कामगार न्यायालयाच्या निर्णयानुसार सन १९८० मध्ये रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर न घेता सन १९८४-८५ पासून रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याचे ठरले आहे. त्यानुसार श्री धनलाल फागु आरसे व श्री. हरिचंद कोदु अतकरी हे दिनांक ०१.०१.१९८६ रोजी व श्री.भोजराज बकाराम हरीणखेडे हे दिनांक ०३.०५.१९८४ रोजी सेवेची ५ वर्षे पूर्ण करतात. सदर मजूर शासन निर्णय

दि.२४.४.२००१ परि.२(i) मधील तरतूदीची पूर्तता करीत असल्यामुळे तसेच सदर प्रकरणी मा.न्यायालयाने दिलेला निर्णय आणि मा.न्यायालयातील दावे मागे घेण्याबाबत त्यांनी केलेली तडजोड विचारात घेऊन त्यांना खालील प्रमाणे रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्यात येत आहे.

| अ. क्र | कर्मचा-यांचे नाव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद व दिनांक | तडजोडीनुसार रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणावयाचे दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचे पद | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री. धनलाल फागु आरसे | रोजंदारी | मजुर १.५.१९७५ | १.१.१९८६ | मजुर | रु.७५०-९४० (जुनी) रु.२५५०-३२०० (पाचवा वेतन आयोग) |
| २ | श्री. हरिचंद कोदु अतकरी | रोजंदारी | मजुर १.५.१९७५ | १.१.१९८६ | मजुर | रु.७५०-९४० (जुनी) रु.२५५०-३२०० (पाचवा वेतन आयोग) |
| ३ | श्री. भोजराज बकाराम हरिणखेडे | रोजंदारी | मजुर ३.५.१९७९ | ३.५.१९८४ | मजुर | रु.७५०-९४० (जुनी) रु.२५५०-३२०० (पाचवा वेतन आयोग) |

२. सर्वश्री.धनलाल फागु आरसे, हरिचंद कोदु अतकरी व भोजराज बकाराम हरिणखेडे यांना त्यांनी धारण केलेल्या पदांवर रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत -

अ) रुपांतरीत अस्थायी अस्थापनेवरील पदांकरिता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान/कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचा-यांचे बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यांत येत आहे.

ब)नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशी व्यतीरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट देखिल शिथिल करण्यात येत आहे.

क)स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यांत येत आहे.

३. अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर यांनी या आदेशातील सर्व अटी व शर्ती विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत निर्गमित करुन ते संबंधित कर्मचा-यांच्या निदर्शनास आणावेत. तपशिलामध्ये संबंधित कर्मचा-यांचे नांव, पदनाम, त्यांच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक किंवा त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर ज्या दिनांकापासून आणण्यात आले आहे, तो दिनांक यामध्ये कोणतीही चूक वा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिकायांनी अशी बाब शासनाच्या निदर्शनास तात्काळ आणावी. क्षेत्रिय अधिका-यांनी सदर आदेशात स्वतःच्या अधिकारात कोणतेही फेरबदल करु नयेत, तसेच हे आदेश संबंधित कर्मचा-याच्या व्यक्तीशः निदर्शनास आणुन शासनाने निर्गमित केलेल्या आदेशांच्या बाबतीत संबंधित कर्मचा--याची (नाव, पदनाम, त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक तसेच रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याच्या दिनांकात दुरुस्ती इ. बाबतीत) कोणतीही तक्रार नसल्यास त्याच्याकडून तशा आशयाचे दिांक २४.०४.२००१ च्या शासन निर्णयासोबतच्या प्रपत्र 'ब' मधील दिलेल्या नमुन्यात हमीपत्र (Undertaking) घेवून ते त्या कर्मचा-यांच्या सेवापटात /सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याबाबतीत संबंधीत अधीक्षक अभियंत्यांनी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत /त्रुटी असल्याची संबंधित कर्मचा-यांची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरुपात घ्यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरुस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याची दक्षता

घ्यावी. दुरुस्ती प्रस्ताव पाठवितांना संबंधित कर्मचा-याच्या नेमणुकांच्या आदेशांच्या प्रती, नाममात्र हजेरी पटाच्या प्रती, आणि सेवापट पाठविण्याची खबरदारी घ्यावी.

४. सर्वश्री.धनलाल फागु आरसे, हरिचंद कोदु अतकरी व भोजराज बकाराम हरिणखेडे यांना ज्या दिनांकापासून रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्यात आले आहे त्या दिनांकापासून या शासन निर्णयाच्या दिनांकापर्यंतची वेतनवाढीच्या फरकाची थकबाकी देय राहिल. तथापि संबंधीत कर्मचा-यांनी मा.औद्योगिक न्यायालय, भंडारा यांच्यासमोर केलेल्या तडजोडीनुसार व प्रत्यक्ष स्टॅम्पपेपरवर दिलेल्या हमीपत्रानुसार स्थगन आदेशांच्या दि.१४.८.१९९७ पर्यंत कोणतीही थकबाकी देय राहणार नाही. तथापि सदर कालावधीतील सेवा संरक्षित करुन देण्यात यावी. तसेच दि.१४.८.१९९७ पासुन हे आदेश निर्गमित होण्याच्या दिनांकापर्यंत देय थकबाकीतील १० टक्के रक्कम शासनास सोडून देण्याबाबतचे हमीपत्र संबंधीत कर्मचा-यांनी दिल्यामुळे ती देय राहणार नाही. त्यामुळे संबंधीतांना दि.१४.८.१९९७ पासुन हे आदेश निर्गमित होण्याच्या दिनांकापर्यंत एकुण थकबाकीतुन १० टक्के थकबाकी वजा करुन निव्वळ देय थकबाकी परिगणित करण्यात यावी. सदर कामगारांची वेतन निश्चिती त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून करण्यात यावी.

५. या निर्णयाप्रमाणे सर्वश्री.धनलाल फागु आरसे, हरिचंद कोदु अतकरी व भोजराज बकाराम हरिणखेडे यांना देय असलेल्या दि. ३१.८.२००० पर्यंतच्या निव्वळ देय वेतनवाढीच्या थकबाकीच्या फरकाची रक्कम (सर्व प्रकारच्या भत्त्यासहीत) दहा समान वार्षिक हप्त्यात द्यावयाची आहे. या रकमेचा पहिला हप्ता सन २०११-२०१२ मध्ये देण्यात यावा. थकबाकीची सर्व रक्कम सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षापासून त्या त्या वर्षाच्या जून महिन्यात संबंधित कर्मचायांच्या भविष्यनिर्वाह निधीत वार्षिक दहा (१०) समान हप्त्यात जमा करावी व प्रत्येक हप्ता भरल्यापासून तीन वर्षापर्यंत सदर रक्कम त्या कर्मचायांना या खात्यातून कोणत्याही प्रकारच्या अग्रीमाच्या स्वरुपात काढता येणार नाही. सदर थकबाकीच्या रकमेवर कोणत्याही प्रकारचे व्याज अनुज्ञेय असणार नाही.

६. दि. १.९.२००० नंतर या आदेशाच्या दिनांकापर्यंतच्या वेतनाच्या फरकाची रक्कम धनादेशाद्वारे (Cheque) अदा करावयाची आहे.

७. या आदेशान्वये रुपांतरीत करण्यात आलेल्या कर्मचा-यावर वेतनापोटी होणारा खर्च सन २०११ ते २०१२ या आर्थिक वर्षात संबंधित लेखाशिर्षाखाली मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा व पुढील वर्षापासून हप्त्याने द्यावयाच्या रकमेची तरतूद त्या त्या वर्षीच्या अर्थसंकल्पात करावी.

८. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. रुअआ १५९६/२२८/सेवा-५, दि. २४ एप्रिल २००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन काढण्यात येत आहेत.

९. हा शासन निर्णय www.maharashtra.gov.in हया संकेत स्थळावर २०११०४०५१६३८०६००१ हया संकेत क्रमांकावर प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सहपत्र **:-प्रपत्र-ब**

( अ.अ.कोदे )
शासनाचे उप सचिव

प्रत अग्रेषित :-

महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२,नागपूर
महालेखापाल, लेखा परिक्षा , महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२,नागपूर
वित्त विभाग (व्यय १२), मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर.
कार्यकारी अभियंता, बाघ इटियाडोह पाटबंधारे विभाग, गोंदिया.
आस्थापना(कामगार) संग्रहार्थ.